महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (शिक्षण सक्षमीकरण शाखा) मधील प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था या संवर्गातील सरळसेवा कोटयातील पदांवर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः ससेप्र ४४१७/प्र.क्र.४१/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१२ जुलै, २०१७

वाचा:- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१५(३)(३)/१०८०दहा, दिनांक ३०.१.२०१७

**शासन निर्णय**-

महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (शिक्षण सक्षमीकरण शाखा) मधील प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था या संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील रिक्त असलेल्य पदांकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन पत्रान्वये एकुण ०२ उमेदवारांची शासनास शिफारस केलेली आहे. सदर शिफारशीस अनुसरून खालील एका उमेदवारांस वेतन बँड रू.१५६००-३९१०० (ग्रेड वेतन रू.६६००/-) या वेतन संरचनेतील प्राचार्य या संवर्गातील स्तंभ क्र.(६) मध्ये नमूद पदावर नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ. क्र. | उमेदवाराचे नांव | म.लो. आ.चा गुणवत्ता क्रमांक | प्रवर्गा करीता शिफारस | दि.२८.४.२०१५ च्या अधिसूचनेन्वये वाटप करण्यात आलेला महसूली विभाग | नियुक्तीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | डॉ.रमेश आप्पाण्णा होसकोटी, कृष्णराज निवास, बोलगेवा गल्ली, मु.पो.हलकर्णी, ता.गडहिंग्लज, जि. कोल्हापूर | २ | भ.ज. “ब” | नागपूर | प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, यवतमाळ |

२. सदर पदस्थापना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) राज्याच्या प्रशिक्षण धोरणाच्या अनुषंगाने सदर उमेदवारांना विहीत पायाभूत प्रशिक्षण पूर्ण करणे आवश्यक राहील. सदर प्रशिक्षण संचालक, विद्या प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत आयोजित करण्यात येईल. तसेच सद प्रशिक्षणाचा कालावधी व रूपरेषा ठरविण्याचे अधिकार संचालक, विद्या प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राहतील.

२) सदर नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवाराचा परिविक्षा कालावधी दोन वर्षाचा राहील. सदर उमेदवारांची पहिली वेतनवाढ त्यांच्या एक वर्षाचा परिविक्षा कालावधी पूर्ण झाल्यानंतर व त्यानंतरची वेतनवाढ त्यांनी परिविक्षा कालावधी पूर्ण केल्यानंतर देण्यात येईल.

३)परिविक्षा कालावधीत सदर उमेदवारांना प्रचलित नियमाप्रमाणे आवश्यक असणारी विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसेच परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करणे आवश्यक राहील. परिविक्षा कालावधीत त्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न केल्यास कोणतीही पूर्वसूचना न देता, त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

४) उपरोक्त उमेदवार यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसे न झाल्यास संबंधित उमेदवारांचे वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

५) महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात येणाऱ्या सुधारणांच्या अधिनतेने सदर उमेदवारांची जेष्ठता राहील. सदर उमेदवारांनी त्यांच्या नियुक्तीच्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत रुजू व्हावयाचे आहे. काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना रुजू होण्यास मुदतवाढ हवी असल्यास तसे सकारण लेखी कळवून मुदतवाढ घेणे आवश्यक आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या गुणवत्ता क्रमांकानुसार त्यांना जेष्ठता मिळणार नाही व ते हजर होतील त्या दिनांकापासून त्यांची जेष्ठता धरण्यात येईल.

६) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोबर २००५ नुसाप परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेतील तरतुदी सदर उमेदवारांना लागू राहतील. तसेच दिनांक १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्ती वेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांबाबत वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंनियो-१००५/१२६/ सेवा-४, दिनांक १८ ऑगस्ट, २००९ मधील तरतुदी सदर उमेदवारांना लागू राहतील.

७) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या श्री.मंगेश भगवान घोगरे (म.लो.आ.क्र.१) यांनी जात वैधता प्रमाणपत्र शासनास अद्याप सादर केलेले नाही. सबब, त्यांचे जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर श्री.घोगरे यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात येतील. तथापि, त्यांची जेष्ठता म.लो.आ.गुणवत्ता क्रमांकानुसार अबाधित राहील.

८) संबंधित उमेदवारांनी त्यांच्या शैक्षणिक अर्हतेबाबत व इतर आवश्यक प्रमाणपत्राच्या मूळ प्रती तपासणीकरीता व साक्षांकित प्रतींचा संच पदस्थापना स्विकारण्याच्या वेळी संबंधित कार्यालय प्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांच्याकडे सादर कराव्यात आणि कार्यालय प्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांनी प्रमाणपत्रांची तपासणी करून संबंधित उमेदवाराला रुजू करून घ्यावे.

९) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संबंधित उमेदवारांनी सादर केलेली सर्व कागदपत्रे संबंधित सक्षम यंत्रणेमार्फत तपासण्याच्या सूचना केलेल्या आहेत. त्यामुळे तपासणीअंती उमेदवारांनी सादर केलेली कागदपत्रे खोटी अथवा बनावट आढळल्यास त्यांच्या सेवा कुठलीही पूर्व सूचना न देता तात्काळ संपुष्टात आणण्यात येतील.

१०) संबंधित उमेदवारांनी या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसात नियुक्तीच्या पदावर रुजू व्हावे. विहीत कालमर्यादेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांना सदर नियुक्तीमध्ये स्वारस्य नसल्याचे समजण्यात येईल आणि सदर नियुक्तीकरीता संबंधित उमेदवारांचा हक्क आपोआप संपुष्टात येईल.

११) महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५ मधील नियम क्र.८(१)(अ) नुसार वरील उमेदवारांची ज्या महसूली विभागात नियुक्ती झाली आहे, त्या विभागात किमान सहा वर्षे इतका सेवा कालावधी पूर्ण करणे आवश्यक राहील.

१२) शासकीय सेवेत रुजू झाल्यानंतर ज्या उमेदवारांना शासकीय सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास त्यांनी एक महिन्याची पूर्वसूचना शासनास देणे आवश्यक राहील अन्यथा त्यांना एक महिन्याचे वेतन शासनाकडे जमा करावे लागेल.

१३) उपरोक्त उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवास भत्ता देण्यात येणार नाही.

१४) वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिकाऱ्यांना लागू असलेले प्रचलित नागरी सेवा विषयक सर्वसाधारण नियम सदर उमेदवारांना लागू राहतील.

३. हे आदेश प्राप्त होताच संबंधित उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व याबाबतचा अहवाल संबंधित कार्यालय प्रमुखांनी आयुक्तांमार्फत शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०७१२१३१९१३८८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2017.07.12 13:16:00 +05'30'

(र. प्र. आटे)
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

डॉ.रमेश आप्पाण्णा होसकोटी, कृष्णराज निवास, बोलगेवा गल्ली, मु.पो.हलकर्णी, ता.गडहिंग्लज, जि. कोल्हापूर

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. संचालक, विद्या प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
   यांना सदर उमेदवारांच्या पायाभूत प्रशिक्षणासंदर्भातील कार्यवाही तात्काळ करण्याच्या विनंतीसह.
३. सर्व संचालक, शालेय शिक्षण विभाग
४. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हा कोषागार अधिकारी,यवतमाळ
९. उपसचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग, ५१/२, ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०० ०२१ (पत्राव्दारे)
१०.सर्व सहसचिव/ उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई.

११.सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई.

१२. निवडनस्ती/ प्रशा-२ कार्यासन.

**प्रत माहितीस्तव :-**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.मंत्री (शालेय शिक्षण), यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

४. मा.विरोधी पक्षनेते (विधानसभा/ विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक

५. मा.विधानसभा सदस्य/ मा.विधानपरिषद सदस्य

६. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक

७. निवडनस्ती,प्रशा-२